स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गाच्या दि.०२.०१.२०१६ रोजी प्रसिद्ध केलेल्या अंतिम ज्येष्ठता सूचीबाबतचे शुद्धीपत्रक.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन शुद्धीपत्रक क्रमांक : ज्येष्ठता २०१५/प्र.क्र.५८/आस्था-१,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक - ०४.१२.२०१८.

वाचा- १) शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.ज्येष्ठता २०१५/प्र.क्र.५८/आस्था-१, दि.०२.०१.२०१६.
२) शासन शुद्धीपत्रक क्र. सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.ज्येष्ठता २०१५/प्र.क्र.५८/आस्था-१, दि.१५.०७.२०१७.
३) कार्यकारी अभियंता, रा.म.विभाग, रत्नागिरी यांचे पत्र क्र. रामवि/रत्ना/आस्था-१/१८६६, दि.२६.०९.२०१७
४) अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र.साबांमंऔ/आस्था/परि, दि.०७.०८.२०१७
५) सहायक अधीक्षक अभियंता यांचे पत्र क्र. जावक क्र.५६७६/वलि १/स्थाअस ज्येष्ठता/२०१८, दि.१९.१०.२०१८.
६) सहायक अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, नागपूर यांचे पत्र क्र.आस्था/का.३ (६)/सुजेयाआ/ ९६६५/२०१८, दि.०१.११.२०१८

**शुद्धीपत्रक-**

संदर्भाधीन १ येथील दि.०२.०१.२०१६ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गाची दि.०१.०१.१९८९ ते दि.३१.१२.२०१४ या कालावधीतील अंतिम ज्येष्ठतासूची प्रसिद्ध करण्यात आली आहे. सदर परिपत्रकान्वये ज्येष्ठता सूचीतील समावेशनाबाबतचे नियमाधीन निकष स्पष्ट करण्यात आले आहेत. तद्नंतर सदर ज्येष्ठता सूचीच्या अनुषंगाने प्राप्त आक्षेप / निवेदने यांची छाननी करुन क्षेत्रीय कार्यालयांकडून प्राप्त माहितीच्या आधारे दि.१५.०७.२०१७ रोजी शासन शुद्धीपत्रक निर्गमित करण्यात आले आहे.

२. तथापि, अद्यापही उपरोक्त ज्येष्ठतासूची व शासन शुद्धीपत्रकाच्या अनुषंगाने आक्षेप व निवेदने प्राप्त होत आहेत.

३. श्रीम. शबाना गफूर शेख व श्री. सिद्धार्थ लिंबाजी पंडित यांची नावे स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांच्या दि.०२.०१.२०१६ रोजीच्या अंतिम ज्येष्ठतासूचीमध्ये अनुक्रमे १९२७ व १९७७ या ज्येष्ठता क्रमांकावर समाविष्ट आहेत. सदर ज्येष्ठतासूचीमध्ये श्रीम. शबाना गफूर शेख व श्री. सिद्धार्थ लिंबाजी पंडित स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांच्या सेवाविषयक तपशीलामध्ये शेरा रकान्यात “पदोन्नत” असे नमूद केले आहे. तथापि, अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, उस्मानाबाद व कार्यकारी अभियंता, रा.म.विभाग, रत्नागिरी यांच्याकडून प्राप्त प्रस्तावानुसार श्रीम. शबाना गफूर शेख व श्री. सिद्धार्थ लिंबाजी पंडित हे स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या

पदावर कार्यरत असून, त्यांची कनिष्ठ अभियंता या पदावर पदोन्नती झालेली नाही. सबब, **श्रीम. शबाना गफूर शेख व श्री. सिद्धार्थ लिंबाजी पंडित यांची स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांच्या दि.०२.०१.२०१६ रोजीच्या अंतिम ज्येष्ठतासूचीमध्ये अनुक्रमे १९२७ व १९७७ येथे शेरा रकान्यात असलेली पदोन्नत अशी असलेली नोंद वगळण्यात येत आहे.**

४. श्रीम. एन.एम पाटील (सौ.निलीमा गोंडे) या शासनसेवेत स्थापत्य अभियांत्रिकी सहायक पदावर सरळसेवेने दि.१०.०६.२००८ रोजी रुजू झालेल्या आहेत. स्था.अभि.सहायक पदाची अर्हताकारी परीक्षा श्रीम. पाटील या सन २०१७ मध्ये दि.०५.०६.२०१७ ते ०८.०६.२०१७ या कालावधीत घेण्यात आलेल्या अर्हताकारी परीक्षेत **पाचव्या संधीत** उत्तीर्ण झालेल्या आहेत.

शासन अधिसूचना दि.०८.०८.२००१ मधील नियम क्र.१३ नुसार स्थापत्य अभियांत्रिकी सहायकाने ३ संधीमध्ये व पहिल्या परीक्षेच्या दिनांकापासून ४ वर्षाच्या कालावधीमध्ये अर्हताकारी परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसेच सदर अधिसूचनेतील नियम क्र.९ नुसार जे स्थापत्य अभियांत्रिकी सहायक विहीत संधी व कालावधीमध्ये अर्हताकारी परीक्षा उत्तीर्ण होणार नाहीत, असे स्थापत्य अभियांत्रिकी सहायक त्यांची ज्येष्ठता गमावतील, अशी तरतूद आहे.

शासन परिपत्रक दि.०२.०१.२०१६ मधील १० (इ) मध्ये नमूद केल्यानुसार स्थापत्य अभियांत्रिकी सहायक पदावर सरळसेवने नियुक्त झालेल्या, ज्या अभियंत्यांनी विहीत मुदतीत व विहीत कालावधीत विभागीय / अर्हताकारी परीक्षा उत्तीर्ण केलेली नाही, त्यांची मॅन्युअल ऑफ डिपार्टमेंटल ॲन्ड एक्झामिनेशन रुल्स (बॉम्बे), दि.०९.०२.१९५८ मधील तरतूदीनुसार, त्यांनी ज्या कालावधीतील विभागीय / अर्हताकारी परीक्षा उत्तीर्ण केली आहे, त्या परीक्षा कालावधीच्या शेवटच्या परीक्षेच्या दिनांकाच्या नंतरच्या लगतच्या दिनांकास त्यांची ज्येष्ठता निश्चित करण्यात आली आहे.

शासन अधिसूचना दि.०८.०८.२००१ व शासन परिपत्रक दि.०२.०१.२०१६ मधील उपरोक्त नियमाधीन तरतूदी पाहता श्रीम. एन.एम.पाटील या विहीत संधी व कालावधीमध्ये अर्हताकारी परीक्षा उत्तीर्ण झालेल्या नसल्याने, श्रीम. पाटील यांना ज्येष्ठतेचा मानीव दिनांक ०९.०६.२०१७ असा देय आहे. तथापि, श्रीम. पाटील यांना त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकानुसार, दि.१०.०६.२००८ असा ज्येष्ठतेचा मानीव दिनांक देण्यात आला आहे. सबब, श्रीम. पाटील यांना देण्यात आलेल्या ज्येष्ठतेच्या मानीव दिनांकामध्ये सुधारणा करणे आवश्यक आहे. श्रीम. पाटील यांना ज्येष्ठतेचा मानीव दिनांक ०९.०६.२०१७ असा देय होत आहे. तथापि, स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गाची शासनाकडून दि.०२.०१.२०१६ रोजी प्रसिद्ध करण्यात आलेली ज्येष्ठता सूची ही दि.०१.०१.१९८९ ते दि.३१.१२.१९८९ या कालावधीसाठीची असल्याने **श्रीम. पाटील यांचे नाव सदर ज्येष्ठतासूचीमधून वगळण्यात येत आहे.**

५. श्री. एल. डी. बोबडे हे शासनसेवेमध्ये सरळसेवेने दि.२८.०५.२००८ रोजी रूजू झाले आहेत. श्री.बोबडे हे स्थापत्य अभियांत्रिकी संवर्गाची अर्हताकारी परीक्षा, सन २०१४ (कालावधी - दि.०२.०६.२०१४ ते दि.०७.०६.२०१४) मध्ये चौथ्या संधीत उत्तीर्ण झाले आहेत. श्री.बोबडे यांची दि.०२.०१.२०१६ रोजीच्या ज्येष्ठतासूचीमध्ये ज्येष्ठता क्र.१४७४ व क्र.२४७९ येथे दुबार नोंद झाली आहे. श्री.बोबडे यांना नियुक्तीनुसार

ज्येष्ठतेचा दिनांक २८.०५.२००८ देऊन, ज्येष्ठतेचा क्रमांक १४७४ असा देण्यात आला आहे. तसेच श्री.बोबडे हे विहीत संधी व विहीत कालावधीत अर्हताकारी परीक्षा उत्तीर्ण नसल्याने शासन अधिसूचना दि.०८.०८.२००१ मधील नियम क्र.९ व १३ मधील तरतूदी व मॅन्युअल ऑफ डिपार्टमेंटल ॲन्ड एक्झामिनेशन रुल्स (बॉम्बे), दि.०९.०२.१९५८ मधील तरतूदीनुसार, त्यांनी ज्या कालावधीतील विभागीय / अर्हताकारी परीक्षा उत्तीर्ण केली आहे, त्या परीक्षा कालावधीच्या शेवटच्या परीक्षेच्या दिनांकाच्या नंतरच्या लगतच्या दिनांकास त्यांची ज्येष्ठता निश्चित करण्यात येऊन त्यांना ज्येष्ठता क्र.२४७९ व ज्येष्ठतेचा मानीव दिनांक दि.०८.०६.२०१४ असा देण्यात आला आहे. उपरोक्त परिस्थितीत श्री. बोबडे हे विहीत संधी व कालावधीत परीक्षा उत्तीर्ण नसलेने, श्री.बोबडे यांना दिलेला २४७९ हा ज्येष्ठता क्रमांक व दि.०८.०६.२०१४ हा ज्येष्ठतेचा मानीव दिनांक योग्य आहे. **सबब, श्री. बोबडे यांच्या संदर्भात अ.क्र.१४७४ येथील दुबार झालेली नोंद वगळण्यात येत आहे.**

६. सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८१२०४१५४७१२५५१८ असा आहे. सदरहू शुद्धीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Vikram Nivrutti Dhamal

Digitally signed by Vikram Nivrutti Dhamal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68e604684d5ae3908b43f3994a5d621ae70aea823677742131dbe7e69348f436, serialNumber=10d36944a4b86eab516b1b70183709c5fb570cfdf5a52755adfef51ed380b836, cn=Vikram Nivrutti Dhamal
Date: 2018.12.04 15:51:42 +05'30'

**( वि.नि.ढमाळ )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सर्व मुख्य अभियंते (स्था), सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र राज्य

२) सर्व अधीक्षक अभियंते (स्था), सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र राज्य

-यांना विनंती करण्यात येते की, सदरहू शासन परिपत्रक आपल्या अधिपत्याखालील सर्वस्थापत्य अभियांत्रिकी सहायकांच्या निदर्शनास आणून देण्यात यावे.

३) प्रधान सचिव, सा.बां.वि, मंत्रालय, मुंबई.

४) कक्ष अधिकारी, आस्था-३, सेवा-२ व संगणक कक्ष, सा.बां.वि., मंत्रालय, मुंबई.

५) निवडनस्ती.